कृषी उन्नती योजना-एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान (MIDH) अंतर्गत राष्ट्रीय फलोत्पादन अभियान सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षाचा अनु. जमाती प्रवर्गाचा दुसऱ्या हप्त्याचा निधी वितरित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: राफअ-२०२४/प्र.क्र. १०७/९-अे,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- ०७ ऑगस्ट, २०२४

संदर्भ:-

१. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.एमआयडीएच/२०१४/प्र.क्र.८२/९-अे,दि. ३० मे, २०१४
२. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र:राफअ-२०२४/प्र.क्र.८१/९-अे, दिनांक ४ जून, २०२४
३. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र:राफअ-२०२४/प्र.क्र.१०७/९-अे, दिनांक ०४ जुलै, २०२४
४. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र. ८०/अर्थ-३, दिनांक २५ जुलै, २०२४
५. केंद्र शासनाच्या कृषी, सहकार व शेतकरी कल्याण विभागाची इंग्रजी F.No.15011/12/2023-MIDH, Dated: 29th July, 2024 चे पत्र
६. संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांचे जा.क्र. मराफऔवमं/लेखा/दुसरा हप्ता मागणी/१९१३०/२०२४, दिनांक २९.०७.२०२४ चे पत्र
७. आदिवासी विकास विभाग, शासन परिपत्रक क्र: बीयुडी-२०२४/प्र.क्र.०२/कार्यासन-६, दिनांक ०१ ऑगस्ट, २०२४

प्रस्तावना:-

सन २०२४-२०२५ मध्ये राज्यात कृषी उन्नती योजना-एकात्मिक फलोत्पादन विकास अभियानांतर्गत राष्ट्रीय फलोत्पादन अभियान राबविण्यासाठी **संदर्भ क्रमांक २** च्या शासन निर्णयान्वये रुपये २०८३३.३३ लाख एवढ्या निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. योजनेंतर्गत सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षाकरिता अनुसूचित जमाती प्रवर्गाचा पहिल्या हप्त्याचा निधी **संदर्भ क्रमांक ३** येथील शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. तद्नंतर **संदर्भ क्रमांक ५** येथील पत्रान्वये सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षाकरिता केंद्र शासनाकडून अनुसूचित जमाती प्रवर्गाचा दुसऱ्या हप्त्याचा निधी प्राप्त झाला आहे. या पार्श्वभूमीवर अनुसूचित जमाती प्रवर्गाचा दुसऱ्या हप्त्याचा मंजूर केंद्र हिस्सा व त्याला समरुप राज्य हिस्सा निधी आदिवासी विकास विभागाने **संदर्भ क्रमांक ७** येथील शासन निर्णयान्वये कृषि विभागाकडे वर्ग केला आहे. सदर निधी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ तथा आयुक्त (कृषि), पुणे यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

शासन निर्णय:-

१. राज्यात कृषी उन्नती योजना-एकात्मिक फलोत्पादन विकास अभियानांतर्गत राष्ट्रीय फलोत्पादन अभियान सन २०२४-२०२५ मध्ये राबविण्यासाठी अनुसूचित जमाती प्रवर्गाचा दुसऱ्या हप्त्यापोटी मंजूर केंद्र

हिस्सा रुपये १,८७,००,०००/- व त्याला समरुप राज्य हिस्सा रुपये १,२४,६६,६६७/- असा एकूण रुपये ३,११,६६,६६७/- (रुपये तीन कोटी अकरा लाख सहासष्ट हजार सहाशे सदुसष्ट फक्त) एवढा निधी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ तथा आयुक्त (कृषि), पुणे यांना वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर योजनेसाठी उपलब्ध होणारा अर्थसंकल्पित निधी केंद्र शासनाने विहीत केल्याप्रमाणे अनुसुचित जमाती प्रवर्गासाठी पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

| प्रवर्ग | केंद्र हिस्सा (६० टक्के) | राज्य हिस्सा (४० टक्के) |
|---|---|---|
| अनुसुचित जमाती | मागणी क्र. - टी -०५<br>२४०१ - पीक संवर्धन<br>(००) (७९६) - जनजाति क्षेत्र उपयोजना<br>(०१) जनजाति क्षेत्र उपयोजना<br>(०१) (०६) - एकात्मिक फलोत्पादन विकासासाठी केंद्र पुरस्कृत अभियान (६० टक्के केंद्रीय हिस्सा) (कार्यक्रम)<br>३३-अर्थसहाय्य (२४०१A०२९) | मागणी क्र. - टी -०५<br>२४०१ - पीक संवर्धन<br>(००) (७९६) - जनजाति क्षेत्र उपयोजना<br>(०१) जनजाति क्षेत्र उपयोजना<br>(०१) (०७) - एकात्मिक फलोत्पादन विकासासाठी केंद्र पुरस्कृत अभियान (४० टक्के राज्य हिस्सा) (कार्यक्रम)<br>३३-अर्थसहाय्य (२४०१A०११) |

३. सदर अभियानाकरिता वितरित करण्यात आलेला निधी कोषागारातून आंहरित करण्याकरिता लेखाधिकारी, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून आणि व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ तथा आयुक्त (कृषी), पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर निधी खर्च करताना तो विहित कार्यपध्दती अनुसरुन सर्व वित्तीय कायदे/प्रक्रियांचे/वित्तीय अधिकाराच्या मर्यादेत/प्रचलित शासन निर्णय, नियम, परिपत्रक/तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अंमलबजावणी यंत्रणांनी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/अधिकारांचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी क्षेत्रीय कार्यालयाची राहील.

५. या योजनेअंतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, आदिवासी विकास, आदिवासी विकास विभाग व कृषि व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठविणेबाबत दक्षता घ्यावी.

६. विभागप्रमुख/नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जमाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

७. सदर निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास पाठवून त्याची प्रत राज्य शासनास पाठवावी.

८. सदर निधी अनुसूचित जमाती घटकांतील लाभार्थ्यांकरिता खर्च करण्याची दक्षता घ्यावी.

९. प्रस्तुत आदेश वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. २५ जुलै, २०२४ नुसार विभागास प्रदान करण्यात आलेले अधिकार तसेच आदिवासी विकास विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: बीयुडी-२०२४/प्र.क्र.०२/कार्यासन ६, दिनांक ०१ ऑगस्ट, २०२४ अन्वये त्या विभागाने दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८०७११४६३०१७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HEMANT GORAKHNATH MHAPANKAR

Digitally signed by HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=1775f5c28a439e88c4c15ab3f88d6a6beb26ad2675a8c7a7ff397b2e5305303d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6756123D309547BB1E152A6AEB6042BDE4040836DF541FD3620CA87FF8E71CC5, cn=HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
Date: 2024.08.07 12:00:57 +05'30'

**(हे. गो. म्हापणकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रती :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा. विराधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, विधानभवन, मुंबई,
५) सर्व सन्माननीय विधानपरिषद / विधानसभा सदस्य,महाराष्ट्र राज्य,
६) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ० ३२,
७) अपर मुख्य सचिव (कृषि), कृषि प पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
९) सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
११) आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
१२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे,
१३) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पणन मंडळ, पुणे,
१४) संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे.
१५) राज्यातील सर्व विभागीय कृषी सह संचालक,
१६) राज्यातील सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी,
१७) कक्ष अधिकारी, कार्यासन ६, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१८) कक्ष अधिकारी, कार्यासन २अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई . ४०० ०३२.
१९) कक्ष अधिकारी, कार्यासन (अर्थसंकल्प-१९, व्यय १४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई . ४०० ०३२.
२०) विविध राष्ट्रीय मंडळावरील महाराष्ट्राचे सदस्य म्हणून कार्यरत असलेल्या जिल्ह्यातील व्यक्ती,
२१) राज्यातील फळे/फुले उत्पादक संघाचे प्रतिनिधी,
**२२)** निवडनस्ती, कार्यासन ९-अे.